महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या पुस्तक प्रकाशन योजने अंतर्गत मंडळाने लिहून घेतलेल्या पुस्तकाच्या लेखकाच्या मानधनात वाढ तसेच मंडळाकडे पुस्तक प्रकाशनार्थ प्राप्त होणाऱ्या हस्तलिखितांचे परिक्षण करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तज्ज्ञांच्या मानधनात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सासंमं-१०१४/३००/प्र.क्र.८०/२०१४/भाषा-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**तारीख: १५ डिसेंबर, २०१४.**

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एफएपी-१०६२, दिनांक १७ ऑगस्ट, १९६२,
२) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.सासंमं-२००१/प्र.क्र.१३५/सांका -१, दिनांक ३० जुलै, २००२.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून राबविण्यात येत असलेल्या पुस्तक प्रकाशन योजने अंतर्गत संदर्भाधीन दिनांक ३० जुलै, २००२ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने लिहून घेतलेल्या पुस्तकाच्या लेखकास प्रत्येक प्रकाशनार्थ १००० शब्दांना रु.३००/- व मंडळाकडे प्रकाशनार्थ आलेल्या पुस्तकांच्या हस्तलिखितांचे परीक्षण करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तज्ज्ञांना रु.५००/- प्रति हस्तलिखित इतके मानधन, असा दर निश्चित करण्यात आला होता. तथापि, लेखकांचे व हस्तलिखित तज्ज्ञांचे परीश्रम विचारात घेऊन या मानधनात कालानुरुप वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये पुस्तक प्रकाशनार्थ योजने अंतर्गत महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने एखादया लेखकाकडून लिहून घेतलेल्या पुस्तकाच्या लेखनासाठी प्रत्येक १००० शब्दांना रु.९००/- (रुपये नऊशे फक्त) इतके मानधन तसेच मंडळाकडे प्रकाशनार्थ प्राप्त झालेल्या हस्तलिखितांचे परीक्षण करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तज्ज्ञांना रु.१,५००/- (रुपये एक हजार पाचशे फक्त) प्रति हस्तलिखित इतके मानधन प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजने अंतर्गत महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या निर्णयानुसार एखाद्या लेखकाकडून लिहून घेतेलेले पुस्तक किंवा मंडळाकडे प्रकाशनाकरीता प्राप्त झालेले एखाद्या लेखकाचे हस्तलिखित अशा दोन्ही प्रकारातील पुस्तकांच्या प्रकाशनाचा संपूर्ण खर्च महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून करण्यात येणार असल्यामुळे प्रकाशनाचे संपूर्ण हक्क महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या स्वाधीन असतील.

३. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून प्रकाशित करण्यात आलेल्या पुस्तकाची दुसरी आवृत्ती लेखकास स्वत: प्रकाशित करावयाची असल्यास संबंधित लेखकाने महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची परवानगी घेणे बंधनकारक राहील.

४. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून लिहून घेण्यात आलेली पुस्तके तसेच मंडळाकडे प्राप्त झालेल्या हस्तलिखितांपैकी निवडक पुस्तके प्रकाशित झाल्यानंतर या दोन्ही प्रकारातील पुस्तकाच्या १५ प्रती संबंधित लेखकांना विनामूल्य देण्याचे अधिकार महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास राहतील.

५. प्रस्तावित योजनेकरीता होणारा खर्च मराठी भाषा विभाग, "मागणी क्र.झेडएफ ०२, २२०५ - कला व संस्कृती (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०१) योजनेतर योजना (०१)(०१) राज्य साहित्य व संस्कृती मंडळ (२२०५ ३१७२) १६ - प्रकाशने" या लेखाशिर्षाखाली त्या त्या वर्षी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२५/सेवा -६,दि. २५ नोव्हेंबर,२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१२१११६४९२१३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhaku Raghunath Chindarkar

Digitally signed by Dhaku Raghunath Chindarkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dhaku Raghunath Chindarkar
Date: 2014.12.15 17:06:01 +05'30'

**( धा.र.चिंदरकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र -२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
६. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
७. वित्त विभाग / (व्यय-४), मंत्रालय, मुंबई,
८. निवड नस्ती (भाषा-३).